**समग्र शिक्षा या केंद्रपुरस्कृत योजनेंतर्गत शिक्षक शिक्षण या योजनेसाठी सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षातील अनुसूचित जाती उपयोजना लेखाशीर्षांतर्गत निधी वितरीत करण्याबाबत.**
**केंद्र हिस्सा (२२०२।७४६)**
**राज्य हिस्सा (२२०२।७५५)**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः डायट-२०२१/प्र.क्र.३८ (भाग २)/प्रशिक्षण**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २१ फेब्रुवारी, २०२२

वाचा -

१. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,शासन निर्णय क्रमांक बीजीटी-२०२१/प्र.क्र.१०/अर्थसंकल्प(विघयो),दिनांक २६ ऑगस्ट,२०२१,१२ नोव्हेंबर,२०२१व शुध्दीपत्रक दिनांक १ सप्टेंबर,२०२१
२. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,शासन निर्णय क्रमांक बीजीटी-२०२१/प्र.क्र.०३/अर्थसंकल्प(विघयो),दिनांक ५ जानेवारी,२०२२ व शुध्दीपत्रक दिनांक १७ जानेवारी,२०२२
३. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,शासन निर्णय क्रमांक बीजीटी-२०२१/प्र.क्र.०३/अर्थसंकल्प(विघयो),दिनांक १८ फेब्रुवारी,२०२२
४. शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय दिनांक २० जानेवारी २०२२

**शासन निर्णय :-**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने संदर्भ क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये. दिनांक ५ जानेवारी,२०२२ व शुध्दीपत्रक दिनांक १७ जानेवारी,२०२२ अधिक्रमित केले आहे. त्यानुसार शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचा दिनांक २० जानेवारी २०२२ चा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे. शिक्षक शिक्षण (Teacher Education) या केंद्रपुरस्कृत योजनेअंतर्गत अनुसूचित जाती उपयोजना लेखाशीर्षाखाली केंद्र शासन हिस्सा ६०% प्रमाणे रू.५०.१० लक्ष व राज्य हिस्सा ४०% प्रमाणे रू.३३.४० लक्ष इतका निधी खालीलप्रमाणे वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

(SCSP Head) अनुसूचित जाती लेखाशीर्ष

(रु. लाखात)

| उद्दिष्ट | वितरीत करावयाची तरतुद | |
|---|---|---|
| | केंद्र हिस्सा (२२०२।७४६) | राज्य हिस्सा (२२०२।७५५) |
| ०१ वेतन | ४७.२५ | ३१.५० |
| ०६ दूरध्वनी.वीज व पाणी | ०.७५ | ०.५० |
| १३ कार्यालयीन खर्च | ०.७५ | ०.५० |
| १४ इमारत भाडेपट्टी व कर | १.३५ | ०.९० |
| **एकूण** | **५०.१०** | **३३.४०** |

केंद्र शासनाचा निधी मागणी क्र.एन-२, २२०२- सर्वसाधारण शिक्षण, (०१),प्राथमिक शिक्षण, ७८९,अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना,(०१)अनुसूचित जाती उपयोजना,(०१)(०३) समग्र शिक्षा अभियान (केंद्र हिस्सा ६० टक्के) कार्यक्रम लेखाशीर्ष २२०२आय ७४६ खाली रू.५०.१० लक्ष व राज्य हिस्स्याचा निधी (०१) (०४) समग्र शिक्षा अभियान (राज्य हिस्सा ४० टक्के) कार्यक्रम लेखाशीर्ष २२०२आय ७५५ खाली रु.३३.४० लक्ष इतका निधी सन-२०२१-२०२२ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावा.

वित्त विभागाच्या दिनांक ६.४.२०२१, २४.६.२०२१, १४.१०.२०२१ व २८.०१.२०२२ रोजीच्या शासन परिपत्रकामधील दिलेल्या निर्देशांचे काटकोरपणे पालन करावे. या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने दिनांक १८.०२.२०२२ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिल्यानुसार,सदर निधी वितरीत करण्यात येत आहे.

सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी व संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, ज्या उद्दिष्टासाठी सदर निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच उद्दिष्टासाठी खर्च करण्यात यावा. सदर योजनेतील लाभार्थ्यांची माहिती MPSIMS वर अद्ययावत करण्यात यावी.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१०६०/व्यय १४,दि. ०२.१२.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२२११८५६१७०३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2022.02.21 18:58:35 +05'30'

**( स्वाती नानल )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
३. अपर मुख्य सचिव (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा परीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, ½ मुंबई, नागपूर.
७. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र शासन, पुणे.
८. संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र,पुणे.
१०.प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
११.निवडनस्ती (प्रशिक्षण).